छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेकरिता मौजे नवसारी ता. जि. अमरावती येथील सर्व्हे क्र. २९ मधील १.४४ हे. आर व सर्व्हे नं. १३३ मधील क्षेत्र ०.८१ हे.आर. असे एकुण २.२५ हे. आर पैकी २.२४ हे. आर जमीन भोगवटामुल्यरहित व महसूल मुक्त पध्दतीने ३० वर्षासाठी भाडे पट्टयाने उपलब्ध करुन देणेबाबत ..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. जमीन २०२३/प्र.क्र.१४८/ज-९**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- ०३/०७/२०२४

**संदर्भ:-** १) शासन निर्णय क्र. जमीन २०२२/प्र.क्र.०९/ज-९ दि. २९/०६/२०२२

२) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्र.कक्ष-२६/म.स/महसूल/कावि-२९७/२०२३, दि.१३/१०/२०२३

३) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई शासन अधिसुचना क्र. टिपीएस-२०२४/अनौ.सं/११/२०२३/ प्र.क्र. ०५/२०२४ /नवि-३०, दि. ११.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील मराठा-कुणबी व कुणबी मराठा या समाजाचा सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक व सांस्कृतिक विकास करणे या उद्दिष्टांकरिता छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) या संस्थेची स्थापना कंपनी कायदा, २०१३ अंतर्गत करण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. सारथी संस्था, पुणे यांना जमिनीची आवश्यकता असून राज्यातील विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणी विभागीय कार्यालय, जिल्हा कार्यालय सुरु करावयाचे आहेत. लक्षित गटातील विद्यार्थी व विद्यार्थीनी यांना अनुक्रमे विभागीय स्तरावर प्रत्येकी ५०० मुलांचे व ५०० मुलींचे स्वतंत्र वस्तीगृह व जिल्हास्तरावर मुलां व मुलींचे प्रत्येकी २५० क्षमतेचे निवासी वस्तीगृह, ५०० विद्यार्थ्यांसाठी अभ्यासीका व ग्रंथालय, कौशल्य विकास केंद्र, सैन्य भरती व पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण केंद्र, जेष्ठ नागरिक समुपदेशन कक्ष, महिला सक्षमिकरण केंद्र इत्यादी सुविधा बांधण्याच्या प्रयोजनासाठी किमान ३.५० हे.आर जमीन आवश्यक आहे. या अनुषंगाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मौजे नवासरी ता.जि.अमरावती येथील सर्व्हे नं. ९७/२ मधील निर्बाध्यरित्या वाटपास उपलब्ध असलेली १.४२ हे.आर जागा महसूल मुक्त व भोगवटारहित किंमतीने, कब्जेहक्काने प्रदान करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तथापी सदर जागेबाबत न्यायालयीन बाब प्रलंबित असल्याने सारथी, पुणे या संस्थेने मौजे नवसारी येथील सर्व्हे क्र. २९ मधील १.४४ हे. आर जमीन व मौजे नवसारी येथील सर्व्हे क्र. १३३ मधील ०.८१ हे. आर अशी एकुण २.२५ हे. आर जमीन उपलब्ध करुन देणेबाबत विनंती केली आहे. त्याअनुषंगाने जिल्हाधिकारी, अमरावती यांनी दिनांक १३/१०/२०२३ अन्वये प्रस्ताव सादर केलेला आहे. तथापी विषयांकित जमिनीवर अमरावती शहराच्या प्रारुप सुधारित दुसऱ्या विकास योजनेत क्रिडांगणाचे आरक्षण होते.

सारथी संस्थेची मागणी, विविध प्रयोजने, किमान जागेची आवश्यकता आणि महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ व महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट लावणे) नियम १९७१ मधील तरतूदीनुसार उक्त संस्थेस जागा प्रदान करण्याच्या अनुषंगाने मा. मंत्री मंडळाच्या दि.०२/०३/२०२२ च्या बैठकीतील घेतलेला निर्णय व मा. मंत्रिमंडळ बैठक दि. ११/०३/२०२४ रोजी मध्ये अमरावती शहराच्या प्रारुप दुसऱ्या सुधारित विकास योजनेत मौजे नवसारी येथील सर्व्हे क्र.२९ व १३३ मधील प्रस्तावित आरक्षण क्र.५-

क्रीडांगण" (भागशः) (क्षेत्र २.२४ हेक्टर) निष्प्रभ ठरविणेबाबत निर्णय घेण्यात आला. त्या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेकरिता मौजे नवसारी येथील सर्व्हे नं. २९ मधील १.४४ हे.आर व सर्व्हे नं. १३३ मधील ०.८१ हे. आर एकुण २.२५ हे. आर पैकी २.२४ हे. आर शासकीय जमीन महाराष्ट्र महसूल अधिनियम , १९६६ च्या कलम ४० मधील तरतूद तसेच महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम १९७१ मधील नियम ५ व ६ मधील तरतुदीन्वये शासनास प्राप्त अधिकार वापरुन भोगाधिकार मूल्यरहित पध्दतीने भोगवटदार वर्ग-२ या धारणाधिकारावर महसूल मुक्त पध्दतीने नियोजन विभागास जमीन वाटपाबाबतच्या खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर प्रकल्पाच्या बांधकामाचे व संचालनाचे काम सारथी संस्थेमार्फत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने यापुर्वी सारथी संस्था, पुणे या संस्थेसकरिता नियोजन विभागास जमीन प्रदान करण्याबाबत निर्गमित करण्यात आलेला संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

<u>अटी व शर्ती :-</u>

१) विषयांकित जमीन नियोजन विभाग **भोगवटादार वर्ग-२** म्हणून धारण करतील.

२) महसूल व वन विभागाच्या पूर्व परवानगीशिवाय सदर जमीन किंवा तिचा कोणताही भाग किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबंध विक्री/देणगी देऊन/अदला बदल करुन/गहाण ठेऊन/पट्टयाने देऊन/खाजगी-सार्वजनिक सहभाग तत्वावर किंवा बाह्य यंत्रणाद्वारे किंवा अन्य कोणत्याही प्रकारे हस्तांतरीत करता येणार नाही.

३) सदर जमिनीवर अथवा त्याच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती/संस्था/कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार करता येणार नाही.

४) तसेच महसूल व वन विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमिनीचे पोट विभाजन करता येणार नाही.

५) विषयांकित शासकीय जमिनीचा वापर केवळ मंजूर प्रयोजनासाठी करण्यात येईल. अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी सदर जमिनीचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा तात्पुरता अथवा कायमस्वरुपी वापर करावयाचा झाल्यास त्यासाठी शासनाच्या महसूल व वन विभागाची पूर्वमान्यता आवश्यक राहील.

६) सदर जमिनीचा ताबा मिळाल्यापासून **३ वर्षांच्या आत** मंजूर प्रयोजनासाठी वापर सुरु करणे बंधनकारक राहील.

७) विषयांकित जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजूर विकास नियंत्रण नियमावलीनुसार विकास होणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त अन्य संबंधित विभाग/शासकीय यंत्रणा यांची मान्यता/पूर्वपरवानगी/ना-हरकत घेणे देखील बंधनकारक राहील.

८) विषयांकीत जागेची मोजणी प्रतिग्रहिता विभागाने संबंधित उप अधीक्षक, भुमी अभिलेख यांच्याकडून करणे बंधनकारक राहील.

९) सदर शासकीय जमीन ३० वर्षाच्या भाडेपट्टयाने मंजूर करण्यात आली असून ३० वर्षानंतर भाडेपट्टयाच्या संबंधित त्या वेळेस अस्तित्वात असलेल्या विहित धोरणानुसार नुतनीकरण करणे अनिवार्य असेल.

१०) याद्वारे प्रदान करण्यात आलेल्या जमीनीपैकी काही भागाची भविष्यकाळात शासकीय/निमशासकीय प्रकल्पासाठी किंवा सार्वजनिक प्रयोजनासाठी आवश्यकता भासल्यास अशी जागा शासनास परत काढून घेण्याचा अधिकार राहील व त्याकरिता कोणताही मोबदला देय राहणार नाही.

११) जिल्हाधिकारी, अमरावती यांना नियम,धोरण व स्थिती-कालानुरूप आवश्यक वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.

१२) वरील अटी/शर्तीपैकी कोणत्याही अटी/शर्तीचा भंग झाल्यास शर्तभंगाबाबत सदर जमीन शासन जमा करण्याचा अधिकार शासनास राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२२०/२०२४/व्यय-९, दि.२४/०५/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०३१५४६१०१२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANE VASANT GOPAL

Digitally signed by MANE VASANT GOPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department,
2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=c621b4190e31904b3dea97e81c85a31bbaaff04c1adea8a8811d74f01da4e724, cn=MANE VASANT GOPAL
Date: 2024.07.03 16:15:11 +05'30'

**( डॉ. वसंत माने )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३) मा. उप मुख्यमंत्री महोदय यांचे सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा/परिषद, विधानभवन, मुंबई.
५) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (महसूल)/अप्पर मुख्य सचिव(नियोजन)/अपर मुख्य सचिव (वित्त)/ प्रधान सचिव (नगर विकास) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) विभागीय आयुक्त, अमरावती.
९) जिल्हाधिकारी, अमरावती
१०) आयुक्त, महानगरपालिका, अमरावती.
११) व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था, (सारथी) पुणे.
१२) जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, अमरावती.
१३) कार्यकारी अभियंता, शहर उपविभाग क्र.१,अमरावती.
१५) मा.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर (१/२).
१६) वित्त विभाग (का-व्यय ९), मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती, कार्यासन ज-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.